**जलसंपदा विभागातील विविध प्रकल्पांची कामे काटेकोर नियोजनानुसार विहित कालावधीत पूर्ण करणेकरीता प्रकल्पावरील विविध घटकांचे संकल्पनाबाबतच्या शासन निर्णयात / परिपत्रकात सुधारणा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन परिपत्रक क्र. मसंसं ०७१७/(३५६/१७)/ मोप्र १**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - २४ ऑगष्ट ,२०१७

**संदर्भ**:- १) शासन निर्णय क्र.मसंस १०१४/ (प्र.क्र.३३४/१४)मोप्र-१, दि.१६/०१/२०१५
२) शासन निर्णय क्र. जविप्र २०१५/(४५/१५)/सुधा-१/जवि, दि.०४/०४/२०१६
३) महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक यांचे तांत्रिक परिपत्रक क्र. अ.अ.(कालवे)/३१०, दि.१७/०५/२०१७.
४) मु.अ. (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांचे पत्र क्र. मुअ(जसं)/का-३/प्रशा-१/ संकल्पन-सुधारणा/(धा१६२/२०१७)/२८७७/२०१७; दि.३०/६/२०१७.

**प्रस्तावना-**

जलसंपदा विभागातील मोठ्या / मध्यम / लघु / जलविद्युत प्रकल्पांतील विविध घटकांचे संकल्पन व संकल्पचित्रे तयार करण्याबाबतची मार्गदर्शक तत्त्वे संदर्भीय शासन निर्णय क्र.१ अन्वये निर्गमित करण्यात आली आहेत.

तसेच संदर्भीय शासन निर्णय क्र.२ अन्वये स्वतंत्र कालवा संकल्पचित्र मंडळाची निर्मिती करण्यात आली आहे. त्यानुसार सर्व प्रकल्पांच्या मुख्य कालवे, शाखा कालवे व वितरिकांची CBL, Cut off Statement व काटछेदांचे संकल्पन म.सं.सं. कालवे मंडळ करते.

महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक यांचे संदर्भ क्र ३ च्या तांत्रिक परिपत्रकानुसार कालव्यामुळे सार्वजनिक वापराने बाधित होणा-या रस्त्यावरील नविन पुलाचे संकल्पचित्र / मुल्यार्पण सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करणे विषयीच्या सूचना आहेत.

उपरोक्त शासन निर्णय व परिपत्रकामुळे क्षेत्रीय स्तरावर निर्माण झालेल्या अडचणी मुख्य अभियंता (जसं), पुणे यांनी त्यांच्या संदर्भ क्र ४ च्या पत्रान्वये शासनास कळविल्या असून जलसंपदा विभागातील विविध प्रकल्पांची कामे काटेकोर नियोजनानुसार विहित कालावधीत पूर्ण करणेकरिता संबंधित शासन निर्णयात / परिपत्रकात सुधारणा करणेबाबत विनंती केली आहे. जलसंपदा विभागाकडील प्रकल्पांच्या विविध घटकांचे संकल्पनाबाबत क्षेत्रीय स्तरावर निर्माण झालेल्या अडचणी खालीलप्रमाणे नमूद केल्या आहेत.

- राज्यातील २६ मोठे/मध्यम/लघु प्रकल्प हे केंद्र शासनाच्या अत्यंत महत्वाकांक्षी प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेअंतर्गत(PMKSY)समाविष्ट असून सदर प्रकल्प सन २०१९-२० पर्यंत पूर्ण करणे अपेक्षित आहे. तसेच राज्यातील काही प्रकल्प दुष्काळी भागात / सिंचन अनुशेष भागातील असल्यामुळे प्रकल्प व कालव्यांची कामे पूर्ण

करण्याबाबत मा.लोकप्रतिनिधींचा व स्थानिक लाभधारकांचा आग्रह असतो. याबाबत वेळोवेळी आक्रमक आंदोलनेसुद्धा होत असतात.

- याअनुषंगाने अशा महत्वाच्या प्रकल्पातील रु.५० लक्ष ते रु.२५० लक्ष किंमतीची कालव्यावरील बांधकामे, तसेच ३ घमी./सें विसर्गापेक्षा जास्त विसर्ग असणा-या कालव्यावरील बांधकामाची संख्या मोठया प्रमाणात असून मध्यवर्ती संकल्पचित्र संघटनेकडून अशी बांधकामांची संकल्पने प्राप्त होण्यास बराच विलंब होतो व याचा कामाच्या प्रगतीवर परिणाम होत आहे.
- बांधकाम पूर्ण झालेल्या अथवा प्रगतीपथावर असलेल्या प्रकल्पांवर विशिष्ट समस्या जसे मजबुतीकरण /दुरुस्ती उद्भवल्यास शासनाच्या आदेशानंतर म.सं.सं. यांचेकडून यावरील अभ्यासाअंती उपापययोजनांचे सविस्तर संकल्पन प्राप्त होऊन त्या कामास पुनःश्च शासनाची प्रशासकीय मंजूरी घ्यावी लागते .त्यामुळे अशा दुरुस्ती कामास विलंब झाल्यास पाण्याची गळती होऊन प्रकल्पीय सिंचन क्षेत्र व प्रत्यक्ष सिंचित क्षेत्र यात तफावत निर्माण होते.
- सर्व संकल्पनास मुख्य अभियंता )संकल्पन (यांनी मंजुरी देणे तसेच कालव्यांचे CBL ,Cut off Statement व काटछेद संकल्पन मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांनी करणे इ. अटींमुळे म.सं.सं., नाशिक यांचेकडील उपलब्ध अपुरी आस्थापना विचारात घेता प्रकल्पावरील प्रत्यक्ष कामे करण्यास विलंब लागू शकतो.
- कालव्यावरील पुलांचे बांधकामामध्ये राज्यरस्ते महामार्ग / राष्ट्रीय महामार्ग यांची संकल्पने यापूर्वीही मसंसं, नाशिक यांचेकडून तयार करुन घेऊनच कामे केली जातात. बुडीत क्षेत्राबाहेरील रस्त्यांवरील पूल बांधकामे ही सार्वजनिक बांधकाम विभागाकडून मंजूर करुन बांधली जातात. उपरोक्त संदर्भिय तांत्रिक परिपत्रक क्र.३ मधील आदेशानुसार रस्ता पुलाचे संकल्पन / मूल्यांकन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संकल्पन मंडळाकडून करुन घेणे बंधनकारक केल्याने अशा संकल्पनासाठी जलसंपदा विभाग परावलंबी होऊन तसेच अशी संकल्पने प्राप्त होण्यास विलंब लागून कामाच्या प्रगतीवर प्रतिकूल परिणाम होण्याची शक्यता आहे.

उपरोक्त नमुद बाबींचा विचार करुन, जलसंपदा विभागातील विविध प्रकल्पांची कामे काटेकोर नियोजनानुसार, विहित कालावधीत पूर्ण करणेकरिता संदर्भीय शासन निर्णयात / परिपत्रकात सुधारणा करणे शासनाच्या विचाराधीन होते. या अनुषंगाने आता खालीलप्रमाणे सुधारित आदेश देण्यात येत आहेत.

**शासन आदेश-**

जलसंपदा विभागातील विविध प्रकल्पांची कामे काटेकोर नियोजनानुसार विहित कालावधीत पूर्ण करणेकरिता प्रकल्पातील विविध घटकांच्या संकल्पनाबाबतच्या संदर्भ क्र १ ते ३ च्या शासन निर्णयात / परिपत्रकात खालीलप्रमाणे सुधारणा करणेत येत आहेत.

१. कामाची गती राखण्यासाठी १० घ.मी./से. पेक्षा कमी वहन क्षमतेच्या कालव्यावरील तसेच रु.१० कोटी किंमतीपेक्षा कमी किंमतीच्या बांधकामांची संकल्पने क्षेत्रिय

संकल्पचित्र विभागाकडून करण्यात यावीत. ( दोन्ही निकषांची एकसमयावेच्छेदे पूर्तता होणे आवश्यक)

२. इतर प्रकल्प घटक उपसा सिंचन योजना, धरण,जलसेतू ,बॅरेज दरवाजे व १५ मी . पेक्षा जास्त उंची असलेल्या कालव्याच्या भरावाची संकल्पचित्रे मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांचेमार्फत तयार करण्यात यावीत.

३. मुख्य कालवे, शाखा कालवे व वितरिकांच्या क्षेत्रिय विभागाने तयार केलेल्या CBL, Cut off Statement, घटककामे व काटछेदाच्या संकल्पनास कालव्यांच्या संरेखा मंजुरीच्या अधिकाराप्रमाणे मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता यांना मान्यतेचे अधिकार राहतील.

४. शासनाचे पूर्व परवानगीने आवश्यकतेनुसार कालव्यावरील बांधकामांची वैशिष्ट्यपुर्ण संकल्पचित्रे गुणवत्तेच्या आधारावर खाजगी नामवंत अभियांत्रिकी सल्लागाराकडून करुन घेणेस क्षेत्रीय मुख्य अभियंता यांना अधिकार देण्यात येत आहेत.

५. बांधकाम पूर्ण झालेल्या अथवा प्रगतीपथावर असलेल्या प्रकल्पाबाबत विशिष्ट समस्या उद्भवल्यास अशा मजबुतीकरण / दुरुस्तीची कामे करण्यास अंतिमत: शासनाची मंजूरी घेणे आवश्यक आहे. तथापि मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना यांनी शासनाच्या मंजूरीच्या आदेशापूर्वी सदर समस्येवर अभ्यास करुन उपाययोजना सुचवाव्यात.

६. V.R., O.D.R., M.D.R. यांना छेदणा-या कालव्यावरील सर्व रस्ता पुलाचे संकल्पन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या विनिर्दिष्ट संकल्पनाबाबत प्रचलित Standard Templates नुसार जलसंपदा विभागाच्या क्षेत्रिय संकल्पचित्र विभागाकडून व राज्य महामार्ग(S.H.), राष्ट्रीय महामार्ग (N.H.) यांना छेदणा-या कालव्यावरील रस्ता पुलांचे संकल्पन सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ना-हरकत प्रमाणपत्र घेण्यात यावे.

७. कार्यकारी अभियंता यांच्या संरेखा मंजूरी अधिकारातील कालव्यांचे Cut off Statement व घटक भागांच्या C. D. Works च्या संकल्पचित्रास मान्यता देणेचे अधिकार अधीक्षक अभियंता यांना राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपब्लध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१७०८२४१२३४१०१७२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2017.08.24 12:25:37 +05'30'

**( श. शं. दाभाडकर)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१. खाजगी सचिव, मा.मंत्री, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई

२. खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री, जलसंपदा व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई

३. मा.विधानसभा /विधानपरिषद सदस्य सर्व
४. स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
५. स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
६. स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता (दवप्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
७. स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
८. स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता (पा.) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
९. सर्व तांत्रिक उपसचिव/अवर सचिव/उपअभियंता, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. सर्व कार्यकारी संचालक
११. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक
१२. महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन, औरंगाबाद
१३. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
१४. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
१५. सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग,
१६. प्रत:- मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.